भूसंपादन आस्थापना- पुणे विभाग

**कृष्णा खोरे विकास महामंडळ, पाटबंधारे विभाग व सार्वजनिक बांधकाम विभाग यांच्या प्रकल्पाकरिता लागणारी खाजगी जमीन भूसंपादन कायदयातील तरतुदीनुसार तातडीने संपादन करण्यासाठी निर्माण करण्यात आलेल्या पुणे विभागातील विशेष भूसंपादन अधिकाऱ्यांच्या पथकास दिनांक ३१.०८.२०२३ पर्यंत मुदतवाढ देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण-२०१८/प्र.क्र.७/(iii)/अ-३**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक- १० एप्रिल, २०२३.

वाचा- १) शासन निर्णय महसूल व वन विभाग क्र.संकीर्ण-२०१८/प्र.क्र.७/(iii)/अ-३,दि. ११.१०.२०२२
२) शासन निर्णय वित्त विभाग क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि. ०८.०२.२०२३
३) विभागीय आयुक्त, पुणे विभाग यांचे क्र.विआपुणे/निवाडा/आस्था/मु.वाढ/१६/२०२३ , दि.१६.०२.२०२३ व क्र.भूसं/आरआर-१/कावि/८९/२०२३,दि. २४.०३.२०२३ ची पत्रे.

**शासन निर्णय-**

राज्यात कृष्णा खोरे विकास महामंडळ, पाटबंधारे विभाग व सार्वजनिक बांधकाम विभाग यांच्यामार्फत राबविण्यात येणारे विविध पाटबंधारे प्रकल्प, द्रुतगती महामार्ग व रस्ते बांधणी यांसारखी विकासाची कामे मोठ्या प्रमाणात हाती घेण्यात आलेली आहेत. या प्रकल्पांच्या कामांसाठी मोठ्या प्रमाणावर लागणाऱ्या खाजगी जमिनी भूसंपादन कायदयातील तरतुदीनुसार संपादन करण्यासाठी व त्याअनुषंगाने इतर भूसंपादनविषयक प्रलंबित कामे पूर्ण करण्यासाठी एकूण १८ अस्थायी पदांना संदर्भाधीन क्रमांक १) येथील शासन निर्णयान्वये दि. २८.०२.२०२३ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली आहे. आता खालील तक्यातील सदर १८ अस्थायी पदांना पुढील अटी/शर्तीवर दि. ०१.०३.२०२३ ते ३१.०८.२०२३ पर्यंत मुदतवाढ देण्यास शासन मंजुरी देत आहे-

१) उक्त पदे ६ महिन्यांपेक्षा अधिक काळ रिक्त नाहीत वा व्यपगत झालेली नाहीत.
२) अस्थायी पदांच्या आढाव्यामध्ये सदर पदांचा समावेश आहे.

| अ.क्र. | कार्यालयाचे नाव | पदनाम | पदांची संख्या |
|---|---|---|---|
| १ | विशेष भूमी संपादन अधिकारी क्र.२६, पुणे | विशेष भूमी संपादन अधिकारी | १ |
| | | अव्वल कारकून | १ |
| | | मंडळ अधिकारी | १ |
| | | लिपिक-नि-टंकलेखक | १ |
| | | चपराशी | २ |
| | | **एकूण** | **६** |
| २ | विशेष भूसंपादन अधिकारी, कृष्णा खोरे, सातारा | विशेष भूमी संपादन अधिकारी | १ |
| | | अव्वल कारकून | १ |
| | | मंडळ अधिकारी | १ |
| | | लिपिक-नि-टंकलेखक | १ |
| | | चपराशी | २ |
| | | **एकूण** | **६** |

| | | | |
|---|---|---|---|
| ३ | विशेष भूसंपादन अधिकारी क्र.११, सोलापूर | विशेष भूमी संपादन अधिकारी (उपजिल्हाधिकारी श्रेणी)<br>अव्वल कारकून<br>मंडळ अधिकारी<br>लिपिक-नि-टंकलेखक<br>चपराशी<br>**एकूण** | १<br>१<br>१<br>१<br>२<br>**६** |
| **एकूण पदे** | | | **१८** |

२. ही सर्व पदे शासनाच्या वेळोवेळी निघालेल्या आदेशांप्रमाणे महागाई भत्ता व पूरक भत्ते मिळण्यास पात्र राहतील. याबाबत होणारा खर्च मागणी क्र.सी-१-२०२९, जमीन महसूल-००१-संचालन व प्रशासन (०१) भूमी संपादन आस्थापना(योजनेतर) (०१) (०३) आयुक्त, पुणे-०१, वेतन (२०२९ ००८२) या लेखाशीर्षाखाली टाकून तो खर्च २०२३-२०२४ या वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा व प्रत्यक्ष खर्च वर्षाअखेरीस संबंधित संपादक विभागाकडे (महसूल व वन विभागाखेरीज) वर्ग करण्यात यावा.

३. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या क्र.पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.०८.०२.२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागांना देण्यात आलेल्या अधिकारांनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०२३०४१११७११३६९४१९ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

KEDARPRATAP JAYSING PATIL

Digitally signed by KEDARPRATAP JAYSING PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8a304b555c16c6333932e94031b478a58b30bb35922ff7cfdc101bf31d56ff8d, pseudonym=B44BFB88097D80ECCD982D439D4A688BB06CD57C, serialNumber=3847160374ED91C72AF7F541ED5885A54E39968A0CDDD47C85355D5B730A40BF, cn=KEDARPRATAP JAYSING PATIL
Date: 2023.04.11 17:17:33 +05'30'

**( केदारप्रताप पाटील )**
कार्यासन अधिकारी, महसूल व वन विभाग

**प्रति,**

१) प्रधान महालेखापाल-१/२, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२) विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे (३ प्रती)
३) जिल्हाधिकारी, पुणे/सातारा/सोलापूर
४) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे/सातारा/सोलापूर
५) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
६) वित्त विभाग (व्यय-९/अर्थसंकल्प-६)
७) नियोजन विभाग
८) सार्वजनिक बांधकाम विभाग
९) जलसंपदा विभाग
१०) अ-१, अ-२, अ-४, ब-१,ई-१,ई-३ कार्यासने, महसूल व वन विभाग
११) निवड नस्ती (अ-३).